नागपूर महसूल विभागातील तहसिलदार भामरागड, सिरोंचा, देसाईगंज यांना जुन्या निर्लेखित वाहनाच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास मंजूरी देणेबाबत.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- वाहन-२०२०/प्र.क्र.७३/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक- २४ ऑगस्ट, २०२०

संदर्भ :-

१. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.जेपीएस-२०१४/प्र.क्र.०९/ई-८, दिनांक २१/०४/२०१६,
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. वाहन-२०१७/प्र.क्र.४१/१७/विनियम, दिनांक २८/०७/२०२०,
३. जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे पत्र क्र. कार्या २/जि.ना./सं.क्र./कावी ६१९/२०२०

**प्रस्तावना :-**

नागपूर महसूल विभागातील लेखाशिर्ष "२०५३- जिल्हा प्रशासन" या खाली वेतन आहरित करणाऱ्या ११६ क्षेत्रीय अधिकाऱ्यांना शासकीय वाहनांच्या अनुज्ञेयतेस संदर्भ क्र.२ येथील दिनांक २१/०४/२०१६ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. जिल्हाधिकारी, गडचिरोली यांच्या संदर्भाधीन क्र.०३ येथील पत्रांन्वये तहसिलदार भामरागड, सिरोंचा, देसाईगंज यांचेकरिता निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदीस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. सदर प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

नागपूर महसूली विभागातील या शासन निर्णयातील सहपत्र "अ" मध्ये नमूद केलेल्या तहसिलदार, भामरागड, सिरोंचा, देसाईगंज यांना त्यांच्या पूर्वीच्या जुन्या निर्लेखित वाहनांच्या बदली नवीन वाहन खरेदी करण्यास व तदप्रित्यर्थ येणाऱ्या रू.८,००,०००/- (रूपये आठ लाख मात्र) च्या खर्चास शासन खालील अटींवर मंजूरी देत आहे.

१. राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने मान्यता दिल्यानुसार अनुज्ञेय वाहन दर करारानुसार नवीन वाहन खरेदी करण्यात यावे.
२. वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील दिनांक २८/०७/२०२० च्या शासन निर्णयान्वये तहसिलदारांसाठी रूपये आठ लाखांच्या मर्यादेत वाहनाची खरेदी करण्यात यावी. वाहन खरेदीसाठी मंजूर केलेल्या अनुदानामध्ये वाहनाची किंमत व करांचा समावेश आहे.
३. नवीन वाहन ज्या अधिकाऱ्यास मंजूर करण्यात आले आहे, त्या अधिकाऱ्याकडूनच त्याचा वापर त्याच कार्यालयाकरिता, शासकीय कामकाजासाठीच करण्यात यावा.

४. नवीन वाहन खरेदी केल्यानंतर त्यासंबंधी अनुपालन अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

२. सदर प्रस्तावातील खर्च लेखाशिर्ष "मागणी क्रमांक- बी- १० ४०५५ - पोलीसांवरील भांडवली खर्च (००)२०७ राज्य पोलीस (००)(१२) नक्षलग्रस्त गडचिरोली जिल्ह्यासाठी पायाभूत सेवा व सुविधा (४०५५०२७९) ह्या उपशिर्षाखाली केंद्र शासनाने उपलब्ध करून दिलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ.सं. क्र.१८४/व्यय-९/२०२०, दिनांक २४/०८/२०२० अन्वये दिलेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२००८२६१६३१०६७३१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

**( अजित देशमुख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२. जिल्हाधिकारी, गडचिरोली
३. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरिक्षा)- २ महाराष्ट्र , नागपूर
४. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
५. सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/विनियम), मंत्रालय, मुंबई- ३२.
६. सह सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.
७. निवड नस्ती, कार्यासन /ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई- ३२.

**सहपत्र 'अ'**

शासन निर्णय महसूल व वन विभाग, क्रमांक-२०१९/प्र.क्र.३३ /ई-८, दि. २४ ऑगस्ट, २०२०
सोबतचे विवरणपत्र

## नागपूर महसूली विभागातील क्षेत्रीय स्तरावरील अधिकाऱ्यांच्या वापरातील निर्लेखित वाहनांचे विवरणपत्र

| अ.क्र. | विभाग/जिल्हा | वाहन वापरणाऱ्या अधिकाऱ्यांचे पदनाम | निर्लेखित वाहनांचा क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | गडचिरोली | तहसिलदार, भामरागड, जि. गडचिरोली | टाटा सुमो जिप MH-३३/सी ११९ |
| | | तहसिलदार, सिरोंचा, जि. गडचिरोली | टाटा सुमो जिप MH-३३/सी ००२७ |
| | | तहसिलदार, देसाईगंज, जि. गडचिरोली | टाटा सुमो जिप MH-३३/सी ००२८ |

**